महालेखापाल कार्यालयाच्या लेखापरीक्षा पथकास आवश्यक
ती कागदपत्रे /अभिलेख विनाविलंब सादर करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

सार्वजनिक बांधकाम विभाग,
परिपत्रक क्रमांक : लेपअ-२०१०/ (४४/२०१०) / लेखापरीक्षा
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २३ जुलै,२०१०.

**परिपत्रक**

या विभागाच्या अधिकारकक्षेतील विविध क्षेत्रीय कार्यालयांच्या लेखापरीक्षणासाठी महालेखापाल कार्यालयाकडून अधिकारी / कर्मचाऱ्यांची पथके पाठविण्यात येतात. मात्र काही कार्यकारी अभियंत्यांच्या कार्यालयातून लेखापरीक्षा पथकास आवश्यक ती कागदपत्रे / अभिलेख उपलब्ध करून दिले जात नसल्याचे उपमहालेखापाल, महाराष्ट्र २, नागपूर यांनी शासनाच्या निदर्शनास आणले आहे. लेखापरीक्षण न झाल्यामुळे निम्न स्तरावरील कार्यालयातील कामकाजाबाबतच्या त्रुटी/ अनियमितता वरिष्ठ कार्यकारी प्राधिकरणाच्या निदर्शनास आणण्याची वैधानिक जबाबदारी पार पाडणे महालेखापाल कार्यालयास शक्य होत नाही. परिणामी लेखापरीक्षणाचा मूळ उद्देश सफल होत नाही. ही बाब गंभीर असून कागदपत्रे सादर न करण्याच्या प्रवृत्तीस आळा घालण्याच्या दृष्टिकोणातून खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१) भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक (कर्तव्ये, अधिकार व सेवाशर्ती ) अधिनियम, १९७१ मधील तरतूदींनुसार, महालेखापाल कार्यालयाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या लेखापरीक्षा पथकास परीक्षणासाठी आवश्यक ती कागदपत्रे / अभिलेख मागविण्याचा अधिकार असून संबंधित कार्यालय प्रमुखांनी ती सादर करणे त्यांचेवर बंधनकारक आहे. त्यानुसार आवश्यक ती सर्व कागदपत्रे लेखापरीक्षा पथकास त्यांच्या मागणीप्रमाणे तात्काळ उपलब्ध करून देण्याची जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखाची राहिल.

२) लेखापरीक्षणासाठी आलेल्या पथकास कार्यालय प्रमुखांनी सक्रिय सहकार्य करावे तसेच त्यांनी उपस्थित केलेल्या सर्व प्रश्नांना समाधानकारक उत्तरे द्यावीत.

३) ज्या कार्यालय प्रमुखांकडून आवश्यक ते अभिलेख / स्पष्टिकरणे सादर करण्यात टाळाटाळ, विलंब करण्यात येईल, अभिलेख / कागदपत्रे सादर करण्यात येणार नाहीत, असे अधिकारी व कर्मचाऱ्यांविरूध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात यावी.

४) सर्व मुख्य अभियंत्यांनी त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील प्रादेशिक विभागातील कार्यालयांकडून या सूचनांचे काटेकोरपणे पालन केले जाईल, याबाबतची दक्षता घ्यावी.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक 20100728144117001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(श्रीमती अस्मिता बाजी)
उपसंचालक

प्रति,
सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
प्रधान महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र, मुंबई.
प्रधान महालेखापाल, ((लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र, नागपूर.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा अधिकारी, मुंबई